**महानगरपालिका क्षेत्रामध्ये केवळ महिलांसाठी**
**"तेजस्विनी बस" योजना सुरु करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१६८/नवि-१६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०९ जानेवारी, २०१७

**संदर्भ :-** शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१६८/नवि-१६ दिनांक ३ जानेवारी,२०१७.

**प्रस्तावना :-**

महिला सुरक्षिततेबाबतची राज्याची प्राधान्यता विचारात घेऊन मा.मंत्री (वित्त व नियोजन ) यांनी सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पिय भाषणामध्ये केलेल्या घोषणेनुसार "तेजस्विनी बस" योजना मुंबई,नवी मुंबई,ठाणे, नागपूर व कल्याण-डोंबिवली अशा शहरात सुरू करण्यास संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. सध्या पुणे ( पुणे महानगरपालिक व पिंपरी-चिंचवड महानगरपालिका) शहरात सदरची योजना सुरू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधीन दिनांक ३ जानेवारी,२०१७ रोजीच्या शासन निर्णयामधील अटी व शर्थीनुसार पुणे ( पुणे महानगरपालिक व पिंपरी-चिंचवड महानगरपालिका) शहरात केवळ महिलांसाठी "तेजस्विनी बस" योजना कार्यान्वित करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. संदर्भाधीन दिनांक ३ जानेवारी,२०१७ रोजीचा शासन निर्णय सुलभ संदर्भाकरीता सोबत जोडला आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०९१७१३१०३२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Shankar Kumbhar

Digitally signed by Vivek Shankar Kumbhar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=UNDER SECRETARY, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ef935067970760fbaec2fa421af2eac23d3b8737b990883be0d8ef292ba28a2f, serialNumber=5e3716fd0fe61ee87305882bc35ee7e757293849e74351e2ab33e4eb40bfb646, cn=Vivek Shankar Kumbhar
Date: 2017.01.09 18:25:19 +05'30'

( विवेक कुंभार )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन,मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (नियोजन व वित्त) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (नगरविकास ) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
५. सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री (नियोजन व वित्त) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

९. विभागीय आयुक्त, कोकण,पुणे व नागपूर
१०.महाव्यवस्थापक, बेस्ट , मुंबई
११.अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, पुणे महानगर परिवहन महामंडळ लि., पुणे
१२.आयुक्त, महानगरपालिका, मुंबई,नवी-मुंबई, ठाणे, पुणे,पिंपरी-चिंचवड, नागपूर व कल्याण-डोंबिवली
१३.आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी, मुंबई-१८
१४.जिल्हाधिकारी,मुंबई शहर, मुंबई उपनगर,ठाणे,पुणे व नागपूर
१५.महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
१६.महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
१७.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१८. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१९.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
२०.जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई शहर, मुंबई उपनगर,ठाणे,पुणे व नागपूर
२१.जिल्हा प्रशासन अधिकारी, मुंबई शहर, मुंबई उपनगर,ठाणे,पुणे व नागपूर
२२.वित्त विभाग, व्यय-३/ कोषा प्रशासन-५/अर्थसं-१६/नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.
२३.कार्यासन नवि-४ नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४.निवड नस्ती (नवि-१६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

महानगरपालिका क्षेत्रामध्ये केवळ महिलांसाठी. "तेजस्विनी बस" योजना सुरु करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१६८/नवि-१६**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**

**दिनांक :- ३ जानेवारी, २०१७**

**प्रस्तावना :-**

राज्यामध्ये नागरीकरण वेगाने होत असून, या शहरी भागामध्ये नोकरी व्यवसायाच्या निमित्ताने प्रवास करण्याऱ्या महिलांची संख्याही मोठया प्रमाणावर आहे. औद्योगिकरण व जागतिकरणाच्या पार्श्वभुमीवर सदरचे प्रमाण दिवसेंदिवस वाढत असून,नागरी क्षेत्रात उत्तम दर्जाची वाहतूक व्यवस्था असणे आवश्यक आहे. राज्यामध्ये सध्या २७ महानगरपालिका कार्यरत असून, काही महानगरपालिका क्षेत्रामध्ये स्वत:ची वाहतूक व्यवस्था कार्यरत आहे.अपु-या बसेसच्या फे-यामुळे ब-याचदा महिलांना गर्दीमधून प्रवास करावा लागतो. महिलांना सुखकर व सुरक्षित प्रवास सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने महिलांकरीता स्वतंत्र बस व्यवस्था होणे आवश्यक आहे.

महिला सुरक्षिततेबाबतची राज्याची प्राधान्यता विचारात घेऊन मा.मंत्री (वित्त व नियोजन ) यांनी सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पिय भाषणामध्ये खालीलप्रमाणे घोषणा केली होती - "मुंबई,नवी मुंबई,ठाणे,पुणे, नागपूर, कल्याण-डोंबिवली अशा शहरांमध्ये नोकरीसाठी वा स्वयंरोजगारासाठी महिला भगिनींना दररोज बसने प्रवास करावा लागतो. ब-याच वेळा गर्दीचा सामना करावा लागतो,रांगेत ताटकळत उभे राहावे लागते.त्यांचा हा त्रास कमी व्हावा,त्यांचा दररोजचा प्रवास सुखकर व्हावा यासाठी या शहरांमध्ये अस्तित्वात असलेल्या सार्वजनिक बस वाहतूक व्यवस्थेच्या माध्यमातून केवळ महिलांसाठी ३०० "तेजस्विनी बसेस" शासनातर्फे देण्यात येत

असून यासाठी सन २०१६-२०१७ मध्ये ५० कोटी रूपये नियतव्यय प्रस्तावित आहे ". त्याअनुषंगाने "तेजस्विनी बस" योजना सुरू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील मुंबई, नवी-मुंबई, ठाणे, कल्याण डोंबिवली, नागपूर या शहरांमध्ये केवळ महिलांसाठी "तेजस्विनी बस" योजना कार्यान्वित करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**२. योजना अंमलबजावणी समिती**

संबंधित महानगरपालिका क्षेत्रामध्ये तेजस्विनी बसेस योजनेची अमंलबजावणी करण्याकरिता खालील-प्रमाणे अमंलबजावणी समिती गठीत करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| महानगरपालिका आयुक्त | - अध्यक्ष |
| अपर आयुक्त/उप आयुक्त(परिवहन) | - सदस्य |
| प्रमुख वित्त व लेखा अधिकारी | -सदस्य |
| महाव्यवस्थापक,(परिवहन) | -सदस्य सचिव |

**३. योजना अंमलबजावणी समितीची कार्यकक्षा-**

सदर योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीकरीता गठीत करण्यात आलेल्या समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील -

१. महानगरपालिका परिवहन सेवेमार्फत तेजस्विनी बसेस योजनेसाठी आवश्यंक बसेसचे मॉडेल,प्रकार (लहान/मध्यम/मोठी) व संख्या निश्चित करणे तसेच, आवश्यकतेनुसार वातानुकुलित बसेस घेणे. याबाबत प्रचलित शासकीय नियम कायदे व मानके याबाबची पूर्तता होत असल्याबाबची खातरजमा करणे.

२. योजनेअंतर्गतच्या बसेसच्या मार्गिका निश्चित करणे.

३. या योजनेतील बसेस फक्त महिलांसाठी चालविण्याकरिता सकाळी ७ ते ११ व सायंकाळी ५ ते रात्री ९ ही वेळ शासनस्तरावरून निश्चित केली असली तरी स्थानिक परिस्थितीनुसार या वेळा ठरविणे.

४. सदर योजनेअंतर्गतच्या बसेसच्या तिकीट दराकरिता शासन स्तरावरून कोणत्याही प्रकारचे अनुदान देण्यात येणार नाही. त्यामुळे व्यावहारिकता तपासून सदरच्या बसेसचे तिकीट दर निश्चित करणे.

५. योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीच्या अनुषंगाने अन्य तद्अनुषंगिक सर्व बाबींबर कार्यवाही करणे.

**४. बसमधील आसन आरक्षण-**

तेजस्विनी बसेस योजनेअंतर्गत चालविण्यात येणा-या व सकाळी ७ ते ११ व सायंकाळी ५ ते रात्री ९ या कालावधी मध्ये सुटणा-या बसेस मधील १००% आसने महिलांकरिता आरक्षित राहतील. या योजनेतील बसेस इतर वेळी नियमीत आसन व्यवस्थेनुसार चालविण्याची मुभा महानगरपालिकेस राहिल. तथापि, स्थानिक परिस्थितीनुसार यामध्ये बदल करण्याची मुभा योजना अंमलबजावणी समितीस राहील.

**५. बस मधील चालक व वाहक-**

महिलाकरिता १००% आसने आरक्षित केलेल्या सकाळी ७ ते ११ व सायंकाळी ५ ते रात्री ९ या कालावधीकरिता संबंधित बसेस मध्ये महिला चालक व वाहक प्राथम्याने उपलब्ध होईल याची दक्षता महानगरपालिकांनी घ्यावी.

**६. बस प्रवासाचे तिकीट दर-**

सदर योजनेअंतर्गत उपलब्ध करून दिलेल्या बसेस करीता संबंधित महानगरपालिका क्षेत्रामध्ये प्रचलित तिकीट दर राहतील.

**७. तेजस्विनी बसेसचे संकल्पचित्र-**

तेजस्विनी योजनेतील बसेसमध्ये एकसमानता राहण्याच्या दृष्टीने संकल्प चित्र (ब्रॅडींग) शासन स्तरावरून निश्चित करून देण्यात येईल.

**८. शासनस्तरावरून निधी उपलब्धता**

योजना अंमलबजावणी समितीने महानगरपालिका क्षेत्रात सदरची योजनेअंतर्गत आवश्यक असणा-या बसेसची संख्या व आवश्यक निधी याबाबत प्रथम आढावा घ्यावा. तद्नंतर प्रथम टप्प्यात आवश्यक असणा-या निधीची मागणी राज्य शासनाकडे करावी. प्राप्त मागणीची छाननी करून बसेस खरेदी करीता शासनाकडून महानगरपालिकेस १००% निधी उपलब्ध करुन देण्यात येईल. निधी उपलब्ध करून देण्यात येईल. वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याची जबाबदारी संबधित महानगरपालिका आयुक्त यांची राहील.देखभाल-दुरुस्तीचा तद्अनुषंगिक खर्च महानगरपालिकेने करावा.

**९. बसेसची खरेदी-**

(अ) सदर योजनेअंतर्गत पर्यावरण पूरक (ग्रीन) बसेस खरेदी करणे अनिवार्य राहील.या बसेसमध्ये सी.सी.टी.व्ही. कॅमेरे, टि.व्ही. , सार्वजनिक उदघोषण यंत्रणा देखिल बसविणे अनिवार्य राहील.

(ब) शासनाकडून उपलब्ध करून देण्यात येणा-या निधीमध्ये स्थानिक गरजेनुसार बसेचे मॉडेल निश्चित करण्यात यावे. या योजनेतील बसेसची खरेदी शासकिय नियमानुसार ई-निविदा पध्दतीने बसेसची खरेदी महानगरपालिका स्तरावर प्रचलित पद्धतीने करण्यात यावी.

(क) शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीमधून अंशत: शिल्लक रहाणा-या निधीमध्ये महानगरपालिकेने स्वत:चा हिस्सा घालून जास्तीच्या बसेस खरेदी करण्याची मुभा महानगरपालिकेस राहिल. तथापि, याबाबतची अधिकची प्रतिपूर्ती

शासन स्तरावरुन करण्यात येणार नाही. महानगरपालिकेने जास्तीच्या खरेदी केलेल्या बसेसनाही सदर योजनेचे निकष लागू राहतील.

**१०. बसेसची देखभाल-दुरूस्ती व बसेस चालविण्याचा खर्च-**

सदर योजनेअंतर्गत बसेस खरेदीकरिता येणा-या भांडवली खर्चाव्यतिरिक्त बसेसच्या देखभाल दुरूस्तीचा, तद्नुषंगिक खर्च करण्याची तसेच, बसेस चालविण्याची जबाबदारी संबधित महानगरपालिकेची राहील. याबाबतची कोणतीही प्रतिपूर्ती शासन स्तरावरुन करण्यात येणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

०३/०१/२०१७

(विवेक कुंभार)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन,मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (नियोजन व वित्त) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
५. सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री (नियोजन व वित्त) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. विभागीय आयुक्त, कोकण व नागपूर
१०. महाव्यवस्थापक, बेस्ट , मुंबई

११. आयुक्त, महानगरपालिका, मुंबई,नवी-मुंबई, ठाणे, पिंपरी-चिंचवड, नागपूर व कल्याण-डोंबिवली
१२. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी, मुंबई-१८
१३. जिल्हाधिकारी,मुंबई शहर, मुंबई उपनगर,ठाणे व नागपूर
१४. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
१५. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१७. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१९. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई शहर, मुंबई उपनगर,ठाणे व नागपूर
२०. जिल्हा प्रशासन अधिकारी, मुंबई शहर, मुंबई उपनगर,ठाणे व नागपूर
२१. वित्त विभाग, व्यय-३/ कोषा प्रशासन-५/अर्थसं-१६/नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.
२२. कार्यासन नवि-४ नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३. निवड नस्ती (नवि-१६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.